/ निबंधक कार्या.
20110908113656001

# महाराष्ट्र शासन

**क्रमांक :** टिपीव्ही-२७०७/९१/प्र.क्र.१८/०७/नवि-२७
नगर विकास विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक : १० ऑगस्ट, २०११.

**प्रति,**

संचालक,
नगर रचना,
महाराष्ट्र राज्य,पुणे.

**विषय :-** नगर रचना संचालनालयातील तांत्रिक संवर्गाचे सेवाप्रवेश नियम...
**संदर्भ :-** शासन अधिसूचना समक्रमांक दि.१.८.२०११

उपरोक्त विषयी संदर्भाकित शासन अधिसूचना मा.राज्यपाल महोदयांच्या मान्यतेनंतर महाराष्ट्र शासनाच्या राजपत्रात मराठी व इंग्रजीत प्रसिद्ध करण्यात आली आहे.

सदर अधिसूचनेच्या ५० प्रती आपणांकडे संग्रहार्थ व आपल्या अधिपत्याखालील महत्वाच्या कार्यालयांना वितरीत करण्याकरीता पाठविण्यात येत आहेत.

आपला,

( सु.भि.[illegible]कर )
अवर सचिव , महाराष्ट्र शासन

**सोबत:** वरील प्रमाणे

**प्रत :-**
१) मा राज्यपाल महोदयांचे प्रधान सचिव (५ प्रती)
२) प्रधान सचिव, मा.मुख्यमंत्री महोदयांचे सचिवालय,मंत्रालय,मुंबई.
३) खाजगी सचिव, मा.राज्यमंत्री नगर विकास यांचे कार्यालय,मंत्रालय,मुंबई.
४) उपसंचालक, नगर रचना, पुणे /नाशिक/कोल्हापूर/अमरावती/नागपूर/नवी मुंबई.
५) प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई.
६) प्रधान सचिव (विधी विधान), विधी व न्याय विभाग, मंत्रालय,मुंबई. (५ प्रती)
७) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई. (२ प्रती)
८) व्यवस्थापक, भाषा संचालनालय, मुंबई. (२ प्रती)
९) कक्ष अधिकारी, नवि-२९ (संगणक कक्ष)
१०) सर्व अवर सचिव, नगर विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.
११) निवड नस्ती - नवि-२७ ( ४ प्रती)

RNI No. MAHBIL/2009/31733
Reg. No. MH/MR/South-339/2010-12



# महाराष्ट्र शासन राजपत्र
# असाधारण भाग चार-अ

वर्ष ३, अंक २६] मंगळवार, ऑगस्ट २, २०११/श्रावण ११, शके १९३३ [पृष्ठ १३
किंमत : रुपये १२.००

**असाधारण क्रमांक ५१**

**प्राधिकृत प्रकाशन**

**महाराष्ट्र शासनाने केंद्रीय अधिनियमांन्वये तयार कलेले (भाग एक, एक-अ आणि एक-ल यांमध्ये प्रसिद्ध केलेले नियम व आदेश यांव्यतिरिक्त) नियम व आदेश.**

**नगर विकास विभाग**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक १ ऑगस्ट २०११

**अधिसूचना**

**भारताचे संविधान**

**क्रमांक** : टिपीव्ही २७०८/९१/सीआर १८/०७/नवि-२७.- भारताच्या संविधान याच्या अनुच्छेद ३०९ खालील परंतुकाद्वारे प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करून आणि याबाबतीत करण्यात आलेले सर्व विद्यमान नियम, आदेश किंवा संलेख यांचे अधिक्रमण करून महाराष्ट्राचे राज्यपाल, याद्वारे, महाराष्ट्र शासनाच्या नगर विकास विभागाअंतर्गत येणाऱ्या नगर रचना आणि मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या,

महाराष्ट्र नगर रचना आणि मूल्यनिर्धारण सेवेतील संचालक, नगर रचना गट-अ, सह संचालक, नगर रचना, गट-अ, उप संचालक, नगर रचना, गट-अ, सहायक संचालक, नगर रचना, गट-अ, नगर रचनाकार,गट-अ, सहायक नगर रचनाकार, श्रेणी-एक, गट-ब, सहायक नगर रचनाकार, श्रेणी दोन, गट-ब या पदांच्या सेवाप्रवेशाचे विनियमन करणारे पुढील नियम करीत आहेत:—

१. या नियमांना, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या महाराष्ट्र नगर रचना व मूल्यनिर्धारण सेवेतील संचालक, नगर रचना, गट-अ, सह संचालक, नगर रचना, गट-अ, उप संचालक, नगर रचना, गट-अ, सहायक संचालक, नगर रचना, गट-अ, नगर रचनाकार,गट-अ, सहायक नगर रचनाकार, श्रेणी-एक, गट-ब आणि सहायक नगर रचनाकार, श्रेणी -दोन, गट-ब (सेवा प्रवेश) नियम, २०११ असे म्हणावे.

२. या नियमांत, संदर्भानुसार दुसरा अर्थ अपेक्षीत नसेल तर,—

(क) **"आयोग"** याचा अर्थ, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, असा आहे ;

(ख) **"पदवी"** याचा अर्थ, सांविधिक विद्यापीठाची पदवी, असा आहे ;

(ग) **"संचालनालय"** याचा अर्थ, शासनाचे नगर रचना आणि मूल्यनिर्धारण संचालनालय, असा आहे;

(घ) **"शासन"** याचा अर्थ, महाराष्ट्र शासन,असा आहे;

(ङ) **"पदव्युत्तर पदवी"** याचा अर्थ, सांविधिक विद्यापीठाची पदव्युत्तर पदवी, असा आहे;

(च) **"मान्यताप्राप्त संस्था"** याचा अर्थ, शासनाने मान्यता दिलेली संस्था, असा आहे;

(छ) **"विद्यापीठ"** याचा अर्थ विद्यापीठ अनुदान आयोगाने मान्यता दिलेले सांविधिक विद्यापीठ, असा आहे.

३. संचालक, नगर रचना, गट-अ या पदावरील नियुक्ती ही, संचालनालयातील सह संचालक, नगर रचना हे पद धारण करणाऱ्या व त्या पदावर तीन वर्षांपेक्षा कमी नसेल इतकी नियमित सेवा झालेल्या व्यक्तींमधून, जेष्ठता लक्षात घेऊन काटेकोर निवडीच्या आधारे, योग्य व्यक्तीच्या पदोन्नतीद्वारे करण्यात येईल.

४. सह संचालक, नगर रचना, गट-अ या पदावरील नियुक्ती ही, संचालनालयातील उप संचालक, नगर रचना हे पद धारण करणाऱ्या व त्या पदावर

तीन वर्षांपेक्षा कमी नसेल इतकी नियमित सेवा झालेल्या व्यक्तींमधून, वरिष्ठता लक्षात घेऊन काटेकोर निवडीच्या आधारे, योग्य व्यक्तीच्या पदोन्नतीद्वारे करण्यात येईल.

५ उप संचालक, नगर रचना, गट-अ या पदावरील नियुक्ती ही एकतर—

**(क)** खालील विहित केलेली अर्हता प्राप्त केल्यानंतर, संचालनालयातील सहायक संचालक, नगर रचना हे पद धारण करणाऱ्या व त्या पदावर तीन वर्षांपेक्षा कमी नसेल इतकी नियमित सेवा झालेल्या व्यक्तींमधून, जेष्ठता लक्षात घेऊन काटेकोर निवडीच्या आधारे, योग्य व्यक्तीच्या पदोन्नतीद्वारे,करण्यात येईल.

(क) स्थापत्य अभियांत्रिकी किंवा वास्तुशास्त्र किंवा नागरी अथवा नगर रचना यांमधील पदवी घेतल्यानंतर शासनाने मान्यता दिलेल्या संस्थेची, वाहतूक व परिवहन रचना किंवा गृहनिर्माण यांतील विशेषज्ञतेसह, कोणतीही असल्यास, नगर रचना किंवा नागरी रचना किंवा नगर व ग्राम रचना किंवा शहर रचना किंवा प्रादेशिक रचना किंवा पर्यावरण रचना यांमध्ये मिळविलेली पदव्युत्तर पदवी ; किंवा

(ख) स्थापत्य अभियांत्रिकी किंवा वास्तुशास्त्र किंवा नागरी किंवा नगर रचना यांमधील पदवी घेतल्यानंतर, स्कूल ऑफ प्लॅनिंग ॲन्ड आर्किटेक्चर, नवी दिल्ली किंवा इतर कोणतेही सांविधिक विद्यापीठ किंवा मान्यताप्राप्त संस्था यांमधील नागरी रचना किंवा नगर रचना किंवा नगर व ग्राम रचना किंवा वाहतूक व परिवहन रचना किंवा नागरी संकल्पचित्र किंवा पर्यावरण रचना यांमधील पदव्युत्तर पदविका ; किंवा

(ग) स्थापत्य अभियांत्रिकी किंवा वास्तुशास्त्र यांमधील पदवी घेतल्यानंतर, नगर रचनाकार संस्था, भारत, नवी दिल्ली यांनी संचालित केलेली परीक्षा उत्तीर्ण होऊन नगर रचनाकार संस्था, भारत, नवी दिल्ली यांचे मिळालेले सहयोगी सदस्यत्व;

(घ) स्थापत्य अभियांत्रिकी किंवा वास्तुशास्त्र किंवा नागरी किंवा नगर रचना यांमधील पदवी घेतल्यानंतर शासनाकडून, नगर रचना यामध्ये त्याच्याशी समकक्ष मानली जाणारी इतर कोणतीही पदव्युत्तर अर्हता ;

**(ख)** (एक) ज्याचे वय पंचेचाळीस वर्षांपेक्षा अधिक नसेल : परंतु, जे आधीच शासनाच्या सेवेत आहेत त्या उमेदवारांच्या बाबतीत वयोमर्यादा पाच वर्षांनी शिथिल करण्यात येईल;

(दोन) ज्याने, नियम ५ **(क)** क,ख,ग किंवा घ मध्ये विहित केलेली अर्हता धारण केली असेल आणि वरील अर्हता प्राप्त केल्यानंतर शासकीय किंवा निमशासकीय संघटनांमध्ये, नगर रचनाकारापेक्षा कमी दर्जा नसलेल्या पदावरील किंवा समकक्ष पदावरील, नगर रचना किंवा नगर रचना आणि जमिनी व इमारती यांचे मूल्यनिर्धारण यांमध्ये पाच वर्षांपेक्षा कमी नसलेला अनुभव असेल:

परंतु, अपवादात्मक अर्हता किंवा अनुभव किंवा दोन्हीही बाबी धारण करणाऱ्या उमेदवारांच्या बाबतीत वयोमर्यादा पाच वर्षांनी शिथिल करण्यात येईल—

अशा उमेदवारांमधून नामनिर्देशनाद्वारे, करण्यात येईल.

६. सहायक संचालक, नगर रचना, गट-अ या पदावरील नियुक्ती ही एकतर—

**(क)** ज्येष्ठता लक्षात घेऊन काटेकोर निवडीच्या आधारे; आणि

(१) स्थापत्य अभियांत्रिकी किंवा नागरी व ग्रामीण अभियांत्रिकी किंवा वास्तुशास्त्र किंवा बांधकाम तंत्रज्ञान किंवा नागरी रचना यांमधील पदवी किंवा मान्यताप्राप्त विद्यापीठाची समकक्ष अर्हता मिळविल्यानंतर, संचालनालयातील नगर रचनाकार म्हणून तीन वर्षांपेक्षा कमी नसेल इतकी नियमित सेवा झालेल्या ; किंवा

(२) संचालनालयाध्ये नगर रचनाकार म्हणून आठ वर्षांपेक्षा कमी नसेल इतकी नियमित सेवा झालेल्या आणि स्थापत्य अभियांत्रिकी मधील किंवा मान्यताप्राप्त संस्थेतून त्याच्याशी समकक्ष असलेली पदविका धारण केलेल्या—

योग्य व्यक्तीच्या पदोन्नतीद्वारे करण्यात येईल.

**(ख)** (एक) ज्याचे वय पंचेचाळीस वर्षांपेक्षा अधिक नसेल :

परंतु, जे आधीच शासनाच्या सेवेत आहेत त्या उमेदवारांच्या बाबतीत वयोमर्यादा पाच वर्षांनी शिथिल करण्यात येईल ;

(दोन) जे एखाद्या विद्यापीठाची स्थापत्य अभियांत्रिकी किंवा नागरी व ग्रामीण अभियांत्रिकी किंवा शहरी व ग्रामीण अभियांत्रिकी किंवा वास्तुशास्त्र किंवा बांधकाम तंत्रज्ञान किंवा नागरी रचना यातील पदवी अथवा समतुल्य

अर्हता धारण करीत असतील आणि उपरोक्त अर्हता संपादन केल्यानंतर ज्यांना नगररचना किंवा नगररचना आणि जमिनी व इमारती यांचे मूल्यनिर्धारण यांमधील ज़बाबदारीच्या पदावरील किमान पाच वर्षांचा अनुभव असेल ;

अशा उमेदवारांमधून नामनिर्देशनाद्वारे करण्यात येईल,—

७. नगर रचनाकार, गट-अ या पदावरील नियुक्ती ही एक तर,

**(क)** सहायक नगर रचनाकार, श्रेणी-एक, सहायक नगर रचनाकार श्रेणी-दोन हे पद धारण करणाऱ्या आणि त्या पदावर किमान तीन वर्षे नियमित सेवा झालेल्या व्यक्तींमधून योग्यतेच्या अधीनतेने सेवा ज्येष्ठतेच्या आधारे एका योग्य व्यक्तीला पदोन्नती देऊन करण्यात येईल ; किंवा

**(ख)** (एक) ज्याचे वय तेहतीस वर्षांपेक्षा अधिक नसेल:

परंतु, ज्यांचे वय अडतीस वर्षांपेक्षा अधिक नसेल अशा, राखीव प्रवर्गातील उमेदवारांचा या कलमान्वये विचार करण्यात येईल :

परंतु, आणखी असे की, जे आधीच शासनाच्या सेवेत आहेत अशा उमेदवारांच्या बाबतीत वयोमर्यादा पाच वर्षांनी शिथिल करण्यात येईल ;

(दोन) जे उमेदवार मान्यताप्राप्त विद्यापीठाची स्थापत्य अभियांत्रिकी किंवा नागरी व ग्रामीण अभियांत्रिकी किंवा शहरी व ग्रामीण अभियांत्रिकी किंवा वास्तुशास्त्र किंवा बांधकाम तंत्रज्ञान किंवा नगररचना यांमधील पदवी अथवा समतुल्य अर्हता धारण करीत असतील आणि उपरोक्त अर्हता संपादन केल्यानंतर ज्यांना नगर रचना, किंवा नगर रचना आणि जमिनी व इमारती यांचे मूल्यनिर्धारण यांमध्ये तीन वर्षांपेक्षा कमी नसलेला अनुभव असेल,

अशा उमेदवारांमधून एका उमेदवारास नामनिर्देशित करून करण्यात येईल.

८. सहायक नगर रचनाकार, श्रेणी एक, गट-ब या पदावरील नियुक्ती ही, जे उमेदवार,—

(एक) तेहतीस वर्षांपेक्षा अधिक वयाचे नाहीत ;

(दोन) मान्यताप्राप्त विद्यापीठाची स्थापत्य अभियांत्रिकी किंवा नागरी व ग्रामीण अभियांत्रिकी किंवा शहरी व ग्रामीण अभियांत्रिकी किंवा वास्तुशास्त्र किंवा बांधकाम तंत्रज्ञान किंवा शहर नियोजन यांमधील पदवी अथवा समतुल्य अर्हता धारण करीत आहेत,—

अशा उमेदवारांमधून एका उमेदवारास नामनिर्देशित करून करण्यात येईल.

९. संचालनालयामध्ये रचना सहायक हे पद धारण करणाऱ्या आणि नियमित तत्त्वावर रचना सहायक या पदावर पाच वर्षे अखंड सेवा झालेल्या व्यक्तीस आयोगाशी विचारविनियमय करून, सहायक नगर रचनाकार, श्रेणी दोन, गट ब म्हणून पदनिर्देशित करता येईल.

१०. नियम ५ मध्ये नमूद केलेल्या उप संचालक, नगर रचना या पदावर; नियम ५ **(क)** मध्ये नमूद केलेले सहायक संचालक, नगर रचना हे पद धारण करणाऱ्या व्यक्तींमधून पदोन्नतीद्वारे आणि नियम ५ **(ख)** मध्ये नमूद केल्याप्रमाणे नामनिर्देशनाद्वारे करावयाची नियुक्ती ही, अनुक्रमे ७५:२५ या प्रमाणात करण्यात येईल.

११. नियम ६ मध्ये नमूद केलेल्या सहायक संचालक, नगर रचना या पदावर; नियम ६ **(क)** (एक) व नियम ६ **(क)** (दोन) मध्ये नमूद केलेले नगर रचनाकार हे पद धारण करणाऱ्या व्यक्तींमधून पदोन्नतीद्वारे आणि नियम ६ **(ख)** मध्ये नमूद केल्याप्रमाणे नामनिर्देशनाद्वारे करावयाची नियुक्ती ही, अनुक्रमे ५०:१०:४० या प्रमाणात करण्यात येईल.

१२. नियम ७ मध्ये नमूद केलेल्या नगर रचनाकार या पदावर ; नियम ७ **(क)** मध्ये नमूद केलेले सहायक नगर रचनाकार, श्रेणी एक, सहायक नगर रचनाकार, श्रेणी दोन ही पदे धारण करणाऱ्या व्यक्तींमधून पदोन्नतीद्वारे आणि नियम ७ **(ख)** मध्ये नमूद केल्याप्रमाणे करावयाची नियुक्ती ही, अनुक्रमे ३०:३०:४० या प्रमाणात करण्यात येईल.

१३. नियम ५,६,७ व ८ यांमध्ये विनिर्दिष्ट केलेल्या पदांवर नामनिर्देशनाद्वारे नियुक्त केलेली व्यक्ती, दोन वर्षांच्या कालावधीकरिता परिविक्षाधीन असेल. जर त्या व्यक्तीने परिविक्षाकाल समाधानकारकरित्या पूर्ण केलेला नसेल किंवा ती त्या पदाकरिता अयोग्य असल्याचे आढळून आले तर, कोणत्याही पूर्व नोटिशीशिवाय तिची सेवा समाप्त करण्यास ती पात्र असेल.

१४. नियम ५,६,७,८ व ९ यांमध्ये विनिर्दिष्ट केलेल्या पदांवर नियुक्त केलेल्या व्यक्तीने हिंदी व मराठी भाषा परीक्षा अगोदरच उत्तीर्ण केलेल्या नसतील अथवा तिला त्यांतून सूट मिळालेली नसेल तर, त्या संबंधात करण्यात आलेल्या नियमांनुसार तिने त्या परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक असेल.

१५. नियम ५,६,७,८ व ९ यांमध्ये विनिर्दिष्ट केलेल्या पदांवर नियुक्त केलेल्या व्यक्तीने, माहिती, तंत्रज्ञान संचालनालय, महाराष्ट्र शासन यांनी वेळोवेळी विहित केलेले संगणक हाताळण्याबाबतचे प्रमाणपत्र धारण करणे आवश्यक आहे.

१६. नियम ५,६,७,८ व ९ यांमध्ये विनिर्दिष्ट केलेल्या पदांवर नियुक्त केलेली व्यक्ती महाराष्ट्र राज्यात कोठेही बदली होण्यास पात्र असेल.

१७. नियम ५,६,७,८ व ९ यांमध्ये विनिर्दिष्ट केलेल्या पदांवर नियुक्त केलेली व्यक्ती, तशी आवश्यकता असल्यास, कोणत्याही संरक्षण सेवेत अथवा भारताच्या संरक्षणाशी संबंधित पदावर भारतामध्ये किंवा भारताबाहेर कोठेही, भारत सरकारने ठरवून दिलेल्या शर्तींवर, प्रशिक्षणावर कालावधी व्यतीत केलेला असल्यास त्या कालावधीसह किमान चार वर्षांच्या कालावधीकरिता काम करण्यास पात्र असेल:

परंतु, कोणत्याही व्यक्तीने तिच्या नियुक्तीच्या दिनांकापासूनचा दहा वर्षांचा कालावधी समाप्त झाल्यावर अथवा ती पन्नास वर्षे वयाची झाल्यावर यांपैकी जे अगोदर घडेल त्याच्यानंतर उपरोक्तप्रमाणे काम करणे आवश्यक असणार नाही.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**टी. सी. बेंजामीन,**
शासनाचे प्रधान सचिव.

## URBAN DEVELOPMENT DEPARTMENT

Mantralaya, Mumbai 400 032, dated the 1st August 2011

*NOTIFICATION*

CONSTITUTION OF INDIA.

No. TPV.2707/91/C.R.180/07/UD-27.– In exercise of the powers conferred by the proviso to Article 309 of the Constitution of India and in supersession of all existing rules, orders or instruments made in this behalf, the Governor of Maharashtra is hereby pleased to make the following rules, regulating recruitment to the "posts of the Director of Town Planning, Group A, the Joint Director of Town Planning Group A, the Deputy Director of Town Planning, Group A, the Assistant Director of Town Planning, Group A, the Town Planner Group A, the Assistant Town Planner Grade I, Group B, the Assistant Town Planner, Grade II, Group B" in the Maharashtra Town Planning and Valuation service in the Directorate of Town Planning and Valuation, under the Urban Development Department of the Government of Maharashtra, namely :–

1. These rules, may be called the Director of Town Planning, Group A, Joint Director of Town Planning, Group A, Deputy Director of Town Planning, Group A, Assistant Director of Town Planning, Group A, Town Planner Group A, Assistant Town Planner Grade I, Group B and Assistant Town Planner Grade II Group B in the Maharashtra Town Planning and Valuation Service in the Directorate of Town Planning and Valuation (Recruitment) Rules, 2011.

2. In these Rules, unless the context requires otherwise,–

(*a*) "Commission" means the Maharashtra Public Service Commission;

(*b*) "Degree" means a degree of a Statutory University;

(*c*) "Directorate" means the Directorate of Town Planning and Valuation of the Government;

(*d*) "Government" means the Government of Maharashtra;

(*e*) "Master's Degree" means a Masters Degree of a Statutory University;

(*f*) "Recognised Institution" means an Institution recognised by the Government;

(*g*) "University" means Statutory University recognised by U.G.C.

3. Appointment to the post of the Director of Town Planning, Group-A shall be made by promotion of a suitable person on the basis of strict selection with due regard to seniority, from amongst the persons holding the post of Joint Director of Town Planning in the Directorate, having not less than three years regular service in that post.

4. Appointment to the post of Joint Director of Town Planning, Group-A, shall be made by promotion of a suitable person on the basis of strict selection with due regard to seniority from amongst the persons holding the post of Deputy Director of Town Planning, in the Directorate, having not less than three years regular service in that post.

**5.** Appointment to the post of Deputy Director of Town Planning, Group-A shall be made either –

(A) by promotion of a suitable person on the basis of strict selection with due regard to seniority from amongst the persons holding the post of Assistant Director of Town Planning, in the Directorate having not less than three years regular service in that post after obtaining the qualification prescribed below -

(*a*) Master's Degree in Town Planning or City Planning or Town and Country Planning or Urban Planning or Regional Planning or Environmental Planning including specialisation if any, in Traffic and Transportation Planning or Housing of Institution recognised by Government obtained after securing a Degree in Civil Engineering or Architecture or Urban or Town Planning; or

(*b*) Post Graduate Diploma in Urban Planning or Town Planning or Town and Country Planning or Traffic and Transportation Planning or Urban Design or Environmental Planning from the School of Planning and Architecture, New Delhi or any other Statutory University or Recognised Institution, obtained after securing a Degree in Civil Engineering or Architecture or Urban or Town Planning; or

(*c*) Associate Membership of Institute of Town Planners, India, New Delhi obtained by passing the Examination conducted by Institute of Town Planners, India, New Delhi., obtained after securing a Degree in Civil Engineering or Architecture; or

(*d*) any other Post-Graduate qualification deemed to be equivalent thereto by the Government in Town Planning after securing a Degree in Civil Engineering or Architecture or Urban or Town Planning; or

(B) By nomination from amongst candidates who –

(*i*) are not more than forty five years of age:

Provided that, the age limit may be relaxed by five years for the candidates who are already in the service of Government;

(*ii*) possess the qualifications as prescribed in Rule 5 (A) (*a*), (*b*), (*c*) or (*d*) and have experience not less than five years in Town Planning or Town Planning and Valuation of lands and Buildings in a post not below the rank of Town Planner or equivalent post in Government or Semigovernment organisations after obtaining the above qualification:

Provided that, the age limit may be relaxed by five years in favour of candidates possessing exceptional qualifications or experience or both.

6. Appointment to the post of Assistant Director of Town Planning, Group-A shall be made either –

(A) by promotion of a suitable person on the basis of strict selection with due regard to seniority; and

(*1*) having not less than three years regular service as Town Planner in the Directorate after obtaining the Degree in Civil Engineering or Civil and Rural Engineering or Architecture or Construction Technology or Urban Planning or equivalent qualification of Recognised University; or

(*2*) having not less than eight years regular service as Town Planner in the Directorate and who possess Diploma in Civil Engineering or Equivalent thereto from a Recognised Institution;

(B) by nomination from amongst the candidates who –

(*i*) are not more than forty five years of age :

Provided that the age limit may be relaxed by five years for the candidates who are already in the service of Government.

(*ii*) possess a Degree in Civil Engineering or Civil and Rural Engineering or Urban and Rural Engineering or Architecture or Construction Technology or Urban Planning of a University equivalent qualification and having experience not less than five years in Town Planning or Town Planning and Valuation of Lands and Buildings in a responsible position, after obtaining the above qualification.

7. Appointment to the post of Town Planner, Group-A shall be made either –

(A) by promotion of a suitable person on the basis of seniority subject to fitness from amongst the persons holding the post of Assistant Town Planners Grade - I, Assistant Town Planners Grade –II, having not less than three years regular service on that post.

OR

(B) by nomination from amongst candidates who –

(*i*) are not more than thirty three years of age :

Provided that, tshe candidates belonging to reserved category, who are not more than thirty-eight years of age, may also be considered under this clause:

Provided further that, the age limit may be relaxed by five years for the candidates who are already in the service of Government;

(*ii*) possess a Degree in Civil Engineering or Civil and Rural Engineering or Urban and Rural Engineering or Architecture or Construction Technology or Urban Planning of Recognised University or equivalent qualification and having experience not less than three years in Town Planning or Town Planning and Valuation of Lands and Buildings, after obtaining the above qualification.

8. Appointment to the post of Assistant Town Planner Grade-I, Group-B shall be made by nomination from amongst the candidates who, –

(*i*) are not more than thirty three years of age;

(*ii*) possesses a Degree in Civil Engineering or Civil and Rural Engineering or Urban and Rural Engineering or Architecture or Construction Technology or Urban Planning of Recognised University or equivalent qualification.

9. The person holding the post of Planning Assistant in the Directorate who has put in five years continuous service on the post of Planning Assistant on regular basis may be designated as Assistant Town Planner Grade-II, Group-B, in consultation with the Commission.

10. Appointment to the post of Deputy Director of Town Planning, mentioned in Rule 5 by promotion from amongst the persons holding the post of Assistant Director of Town Planning as mentioned in Rule 5 (A) and by nomination as mentioned in Rule 5 (B) respectively shall be made in the ratio of 75:25.

11. Appointment to the post of Assistant Director of Town Planning mentioned in Rule 6 by promotion from amongst the persons holding the post of Town Planner as mentioned in Rule 6 (A) (*i*) and Rule 6 (A) (*ii*) and by nomination as mentioned in Rule 6 (B) respectively, shall be made in the ratio of 50:10:40.

12. Appointment to the post of Town Planner mentioned in Rule 7, by promotion, from amongst the persons holding the post of Assistant Town Planner, Grade - I, Assistant Town Planner Grade - II, as mentioned in Rule 7 (A) and by nomination as mentioned in Rule 7 (B) respectively, shall be made in the ratio of 30:30:40.

13. A person appointed by nomination on the posts specified in Rules 5, 6, 7 and 8 shall be on probation for a period of two years. The probation period may be extended maximum up to one year, if, the person does not complete probation period satisfactorily or is found unsuitable for the post then he will be liable to be terminated from service without any prior notice.

14. A person appointed to the posts specified in Rules 5, 6, 7, 8 and 9 shall be required to pass examination in Hindi and Marathi according to the Rules made in that behalf, unless he has already passed or has been exempted from passing these examinations.

15. A person appointed to the posts specified in Rules 5, 6, 7, 8 and 9 should possess a certificate in computer operations prescribed by the Directorate of Information Technology, Government, from time to time.

16. A person appointed to the posts specified in Rules 5, 6, 7, 8 and 9 shall be liable for transfer anywhere in the State of Maharashtra.

17. A person appointed to the posts specified in Rules 5, 6, 7, 8 and 9 shall, if so required, be liable to serve in any Defence service or post connected with the Defence of India anywhere in India or abroad, for a period of not less than four years, including the period spent on training, if any, on such conditions as are determined by the Government of India :

Provided that, no person shall be required to serve as aforesaid after the expiry of a period of ten years from date of his appointment or after he has attained the age of fifty years, whichever is earlier.

By order and in the name of Governor of Maharashtra

T. C. Benjamin,
Principal Secretary to Government.

ON BEHALF OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, PRINTED AND PUBLISHED BY SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI, PRINTED AT GOVERNMENT CENTRAL PRESS, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004 AND PUBLISHED AT DIRECTORATE OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004. EDITOR : SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI.